॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥ 882▲

# मातृशक्तिचा घोर अपमान

## मातृशक्तिका घोर अपमान ( मराठी )



गीताप्रेस गोरखपुर
GITA PRESS, GORAKHPUR

स्वामी रामसुखदास

॥ श्रीहरिः ॥

# मातृशक्तीचा घोर अपमान

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

स्वामी रामसुखदास

**पुस्तकें यहाँ भी उपलब्ध हैं—**

**गीताप्रेस, गोरखपुरकी पुस्तक-दूकान**

१-सूरत— वैभव एपार्टमेन्ट, भटार रोड ✆ ( 0261 ) 2237362, 2238065

२-मुम्बई— 282, सामलदास गाँधी मार्ग ( मरीन लाईन्स स्टेशनके पास ) ✆ ( 022 ) 22030717

३-नागपुर— 851, न्यू इतवारी रोड ✆ ( 0712 ) 2734354

४-जलगाँव— 7, भीमसिंह मार्केट, रेलवे स्टेशनके पास ✆ ( 0257 ) 2226393

५-औरंगाबाद— रेलवे स्टेशन, प्लेटफार्म नं० १

६-हैदराबाद—दूकान नं० 41, 4-4-1, दिलशाद प्लाजा, सुल्तान बाजार ✆ ( 040 ) 24758311

**सं० २०७४ तेरहवाँ पुनर्मुद्रण** १,५००

कुल मुद्रण ४९,५००

❖ **मूल्य—₹ ५**
**( पाँच रुपये )**

प्रकाशक एवं मुद्रक—

**गीताप्रेस, गोरखपुर—२७३००५**

**( गोबिन्दभवन-कार्यालय, कोलकाता का संस्थान )**

फोन : ( ०५५१ ) २३३४७२१, २३३१२५० ; फैक्स : ( ०५५१ ) २३३६९९७

web : **gitapress.org** e-mail : **booksales@gitapress.org**

गीताप्रेस प्रकाशन **gitapressbookshop. in से online** खरीदें।

॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# नम्र निवेदन

आज समाजामध्ये जी एक महापापरूपी दूषित परंपरा प्रचलित होत आहे आणि लोकामध्ये जो एक आश्चर्यकारक रिवाज पडत आहे, त्याच्या गंभीरतम दुष्परिणामांना लक्षात घेऊन श्रद्धेय श्रीस्वामीजी महाराजांनी सर्व स्त्री-पुरुष तसेच बंधू भगिनींना योग्य दिशा-निर्देश करण्यासाठी चार वेगवेगळ्या शीर्षकांच्या माध्यमातून आपले बहुमूल्य विचार व्यक्त केले आहेत. त्यांच्या विशेष उपयोगितेचा विचार करून एक स्वतंत्र पुस्तक प्रकाशित केले गेले आहे "मातृशक्तीचा घोर अपमान," "हुंडा पद्धतीमुळे हानि" "ढोल अनाडी शूद्र पशू स्त्री" तसेच 'मातृशक्तीचा तिरस्कार' या शीर्षकाखाली उपर्युक्त निबंध स्वामीजींचे उत्कृष्ट विचार लोक कल्याणसाठी तसेच लोकांना योग्य मार्ग दर्शविण्यासाठी प्रस्तुत केले गेले आहेत. या पुस्तकामध्ये स्वामीजी महाराजांनी स्त्री-पुरुषांना त्यांच्या कर्तव्य-अकर्तव्याचा बोध करवून त्यांच्याकडून ज्ञात-अज्ञात केल्या जाणाऱ्या दुष्कर्माविषयी सचेत केले आहे आणि शास्त्राज्ञा काय आहे, करणीय काय आहे, अकरणीय काय आहे, त्याचा निर्देश करून त्याच भारतीय सनातन-परंपरेचे अनुकरण, अनुसरण करण्यावर विशेष भर दिला आहे. पाप-पुण्याची परिभाषा करत पुण्यकर्माच्या नित्य सदनुष्ठानाकडे प्रयत्नशील राहण्याचा मार्ग सांगितला आहे.

मुळात यामध्ये ब्रह्मचर्य-पालन, युक्त आहार-विहार, त्यागवृत्ती, निर्लोभिता, शास्त्रमर्यादानुसार व्यवहार करणे, गृहस्थी-जीवनाची वास्तविक शिकवण तसेच कामनेच्या समूळ उच्छेदनाची शिकवण दिली गेली आहे. हे वाचल्याने तसेच यातील गोष्टी आचरणात आणल्यास जीवनात अवश्य लाभ होईल तसेच इहलोक परलोक सुधारेल आणि वास्तविक सुख-शांतीचीही प्राप्ती होईल, असा आमचा विश्वास आहे.

**—प्रकाशक**



॥ श्रीहरि: ॥

# विषय-सूची

**विषय** **पृष्ठ-संख्या**





# १. मातृशक्तीचा घोर अपमान

**मन जाने सब बात, जान बूझ अवगुण करे।**
**क्यों चाहत कुसलात, कर दीपक कूएँ पड़े॥**

वर्तमानकाळात असे अत्यंत भयानक पाप होत आहेत की, ते ऐकल्यावर रोमांच उभे राहतात, डोळे भरून येतात, हृदय द्रवित होते. राम-राम-राम, किती घोर अन्याय, किती भयानक पाप तुम्ही करीत आहात, परंतु तुमचे तिकडे लक्षच नाही. मनुष्यशरीर सर्वामध्ये दुर्लभ म्हटले गेले आहे—

**दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभंगुरः।**

(श्रीमद्भा० ११।२।२९)

**लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसम्भवान्ते**
**मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः।**

(श्रीमद्भा० ११।९।२९)

**बड़े भाग मानुष तनु पावा। सुर दुर्लभ सब ग्रंथन्हि गावा॥**

(मानस ७।४३।७)

अशा दुर्लभ मनुष्यशरीराला आरंभीच नष्ट करणे, कापून टाकणे, जीवाशी केलेला केवढा घोर अपराध आहे, केवढा अन्याय आहे, केवढे पाप आहे. माझ्या अंतःकरणाला भयंकर दुःख होत आहे, ज्वलन होत आहे पण काय करू? ज्या मनुष्यशरीराद्वारा परमात्मप्राप्ती होते, ते मनुष्यशरीर उत्पन्नच होऊ न देणे, नष्ट करून टाकणे ही पापाची शेवटची सीमा आहे. कोण्या जीवाला दुर्लभ मनुष्यशरीर मिळू नये, एखाद्याचे कल्याण होऊ नये, उद्धार होऊ नये यासाठी गर्भधारणाच होऊ न देणे, आगोदरच औषधी सेवन करून नष्ट करणे, गर्भपात करून नष्ट

करणे, भ्रूणहत्या करून नष्ट करणे, गर्भ कापून नष्ट करणे, गर्भस्त्राव करून नष्ट करणे मग पाप लागले तरी हरकत नाही, नरक भोगावा लागला तरी चालेल, परंतु एखाद्याला कल्याणाची संधी प्राप्त होऊ न देण्याविषयी तुम्ही कंबर कसून तयार झाला आहात. आता मी काय करू? कोणाला सांगू? आणि माझे कोण ऐकेल? कोणी ऐकत नाही.

आम्हा साधूंसाठी शास्त्र असे सांगते की, चातुर्मासात आम्ही प्रवास करू नये. आम्ही दोन महीने एका ठिकाणी राहतो, कोणी तीन महीने राहतात, कोणी चार महीने राहतात. कारण चातुर्मासामध्ये पाऊस पडतो त्यावेळी प्रत्येक बीजापासून अंकुर उत्पन्न होतो. अंकुरापासून रोपटे बनते आणि नंतर वाढ होऊन तो वृक्ष बनतो. चालण्या-फिरण्याने अंकुर पायातळी येऊन नष्ट होतात. म्हणून चातुर्मासामध्ये चालणे-फिरणे बंद करतात, असे केल्याने कोणाचीही हिंसा होत नाही. भगवतामध्ये असा विषय आला आहे की, जर हिंसेवर विजय प्राप्त करावयाचा असेल तर शरीराच्या क्रिया कमी कराव्यात—"**हिंसा कायाद्यनीहया**" (७।१५।२३). जर स्थावर जीवांच्या हिंसेबाबत इतका विचार केला आहे की, चातुर्मासामध्ये चालणे-फिरणे यास मनाई केली आहे तर मग जंगम जीवासंबंधी काय सांगावे? परंतु आज लोक जंगम जीवां-मध्येसुद्धा सर्वात श्रेष्ठ, नव्हे नव्हे देवतांपेक्षाही श्रेष्ठ असलेल्या मनुष्यशरीराचा नाश करण्यासाठी प्रयत्न करीत आहेत. अशा लोकांची किती वाईट दशा होईल?

मी अभिमानाने सांगत नाही, तर मी जसे ऐकले आहे, मला जसे समजले आहे, तसे सांगत आहे की, हिंदू-संस्कृतीने जीवाच्या उद्धारासाठी जेवढा प्रयत्न केला आहे. तेवढा दुसऱ्या कोणत्याही

संस्कृतीने केला नाही. ख्रिश्चन, मुसलमान, यहुदी, बुद्ध, पारसी इत्यादी कोणत्या सांप्रदायाने जीवाच्या कल्याणासाठी प्रयत्न केला आहे? कोणता सांप्रदाय केवळ जीवाच्या कल्याणासाठी निर्माण झाला आहे? तुम्ही स्वतः बघून घ्या. ते आपली संख्या वाढवण्याचा, आपल्या मताचा प्रचार करण्याचा प्रयत्न तर करतात, परंतु सर्व जीवांच्या कल्याणाचा प्रयत्न करीत नाहीत. जी संस्कृती केवळ जीवाच्या कल्याणासाठीच आहे, त्यात एखाद्या जीवाला जन्म घेऊ न देणे, त्याला अगोदरपासूनच थांबवणे, नष्ट करणे, केवढे भयंकर पाप आहे. आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, या पापाला आज सामाजिक सभ्यतेचा दर्जा प्राप्त झाला आहे. याचा अर्थ असाच होतो की, लवकरात लवकर नरकात जावयाचे आहे, भयंकर-भयंकर नरक भोगावयाचा आहे. जर नरकात जाणे बंद होईल तर आश्चर्याची गोष्ट होईल.

विचार करा, कोणाचीही प्रगती थांबवणे काय पुण्य आहे? एखादा श्रीमंत होऊ इच्छित असेल तर त्याला श्रीमंत होऊ न देणे, धर्मात्मा होऊ इच्छित असेल तर त्याला धर्मात्मा होऊ न देणे, कल्याण करू इच्छित असेल तर त्याचे कल्याण होऊ न देणे, शरीराने हृष्ट-पुष्ट होऊ इच्छित असेल तर त्याला हृष्ट-पुष्ट होऊ न देणे, हे काय पुण्य आहे? आपल्या किंचित् सुख-सुविधेसाठी दुसऱ्या जीवांचा नाश करणे, जे भगवत्प्राप्तीच्या मार्गाचे क्रमण करू शकत होते, त्यांना जन्म घेऊ न देणे केवढा अन्याय-अत्याचार आहे. हे अन्नदाते हो! जाणून-बुजून असे घोर पाप करू नका. एवढी तरी कृपा करा. मी तुमच्या घरचा बालक आहे, तुम्हीच माझे पालन-पोषण केले आहे, आजही तुमच्याकडूनच माझा जीवननिर्वाह होत आहे. तुम्ही सर्व माझे आई बाप आहात.

थोडी तरी कृपा करा आणि असे घोर पाप करू नका. पाराशरस्मृतीत म्हटले आहे—

**यत्पापं ब्रह्महत्याया द्विगुणं गर्भपातने।**
**प्रायश्चित्तं न तस्यास्ति तस्यास्त्यागो विधीयते॥**

(४।२०)

"ब्रह्महत्येने जे पाप लागते त्यापेक्षा दुप्पट पाप गर्भपात केल्याने लागते. या गर्भपातरूपी महापापाला कोणतेही प्रायश्चित्त नाही, याविषयी तर स्त्रीचा त्याग करणे, तिला आपली पत्नी न मानणे असे विधान आहे"

जर तुम्हाला संतान कमी व्हावे असे वाटत असेल तर ब्रह्मचर्य पालन करा. त्याला आमचे अनुमोदन राहील. तुम्ही ब्रह्मचर्य पालन कराल तर तुम्हाला पाप लागणार नाही, उलट शरीर निरोगी होईल, हृष्ट-पुष्ट होईल, परंतु शरीराचा नाश करणे आणि संतान उत्पन्न न करणे ही केवढी शरमेची, केवढी दुःखाची गोष्ट आहे.

**श्रूयतां धर्मसर्वस्वं श्रुत्वा चैवावधार्यताम्।**
**आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत्॥**

धर्मसर्वस्व ऐका आणि ऐकून त्याप्रमाणे आचरण करा. जे आचरण आपल्याला प्रतिकूल असेल, तसे दुसऱ्यांशी वागू नका. एखादा तुमची प्रगती थांबवत असेल, तुमचा जन्म थांबवत असेल, तुमची वाढ थांबवत असेल, तुमच्या शिक्षणात अडथळा करीत असेल, तुमचे भजन-ध्यान थांबवत असेल, तुम्हाला इष्टप्राप्तीपासून वंचित करीत असेल, तर त्याला पाप लागेल का पुण्य लागेल? जरा विचार करा! एखादा जीव मनुष्यजन्मात येत आहे, त्यात अडथळा निर्माण करणे, त्याला जन्मच घेऊ न देणे, केवढे मोठे

पाप आहे? हां, तुम्ही ब्रह्मचर्य पालन करा, मग तर तुमचे शरीरही चांगले राहील आणि पापही लागणार नाही. परंतु भोग भोगून शरीराचा नाश करायचा आणि संतान उत्पन्न होऊ द्यायची नाही ही फार भयंकर पतनाची बाब आहे.

लहान–सहान जीवजंतूंना तुम्ही मारून टाकता. ते बिचारे काहीही करू शकत नाहीत. परंतु भगवंताच्या दरबारामध्ये काय न्याय नाही? निर्बलाला नष्ट करणे केवढे पाप आहे? महाभारताचा इतिहास आपण ऐका–वाचा. युद्धाचे प्रसंगी प्रथम दुसऱ्याला सावधान करतात आणि नंतर बाण सोडतात. शत्रूवर बाण सोडतानाही प्रथम त्याला सावध करतात आणि नंतर बाणांचा मारा करतात. जे बिचारे काहीही करू शकत नाहीत, स्वतःला वाचवूही शकत नाहीत आणि तुमचे काही अनिष्टही करू शकत नाहीत, अशा क्षुद्र जतूंना नष्ट करणे फार मोठा अन्याय, अत्याचार आहे. सज्जन हो! ह्या गोष्टीकडे थोडे लक्ष द्या, थोडा विचार करा! तुम्ही आपले वाईट होऊ इच्छित नाही तर दुसऱ्याचे वाईट करण्याचा तुम्हाला काय अधिकार आहे? म्हणून कोणाच्याही सुखात अडथळा आणू नका, कोणाच्याही प्रगतीत अडथळा आणू नका, कोणाच्याही जन्माला थांबवू नका, कोणाचेही भले होण्यात बाधा आणू नका. जी गोष्ट तुम्ही तुमच्यासाठी इच्छित नाही, त्या गोष्टीची इच्छा दुसऱ्यासाठीही करू नका. हा सर्वप्रथम धर्म आहे.

जे जीव असमर्थ आहेत, काहीही करू शकत नाहीत, त्यांच्याशी अत्याचार करणे भगवंतांना सहन होत नाही. जे दुसऱ्यांच्या नाशासाठी आपले सामर्थ्य उपयोगात आणतात, त्यांना गीतेने असुर म्हटले आहे—**''प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः''** (१६।९).

जाणून–बुजून मूक्या, असमर्थ जीवांची हत्या करीत आहात आणि स्वत:चे भले होण्याची इच्छा ठेवीत आहात. भले कसे होईल? कल्याण कसे होईल? मी तर अंत:करणापासून अशी इच्छा करतो की, तुम्हालोकांची दुर्गती होऊ नये, तुमचे कल्याण व्हावे, तुमचा उद्धार व्हावा. पण मी करू तरी काय?

हिंदू–संस्कृती जितकी जीवाची आध्यात्मिक प्रगती सांगते तितकी दुसरी कोणती संस्कृती सांगते? ख्रिश्चन, मुसलमान, इत्यादी सर्व आपापले गट वाढविण्याचे काम करतात की, आमच्या सांप्रदायाला मानणाऱ्या लोकांची संख्या अधिक व्हावी आणि आमचेंच नाव लौकिक वाढावे, परंतु सर्व जीवांचे कल्याण व्हावे, उद्धार व्हावा, ते दु:खापासून, नरकापासून, जन्म–मरणापासून मुक्त व्हावेत, त्यांना नित्य परमानंदाची प्राप्ती व्हावी अशी तळमळ कोणाला आहे? विश्वशांतीसाठी, विश्व कल्याणासाठी, यज्ञ इत्यादी कोण करतो? मी दिल्लीत एक छापलेला कागद वाचला त्यात असे लिहीले होते की, जो मूर्तिपूजक असेल त्याला मारून टाका. जे मूर्तिपूजा करतात ते कोणता अन्याय करतात? कोणते पाप करतात? कोणाचे नुकसान करतात? त्यांनी मूर्तिपूजा केली तर तुम्हाला त्यांच्याकडून कोणता प्रतिबंध होतो? आता आपण सांगा की, असा कोणता सांप्रदाय आहे जो जीवाच्या कल्याणाविषयीच सांगतो?

**उमा संत कइ इहइ बडाई। मंद करत जो करइ भलाई॥**

(मानस ५।४१।७)

असा विषय ज्या संस्कृतीत आला आहे, त्यात एखादा जीव जन्माला येऊ नये, यासाठी आरंभीच नसबंदी करणे, गर्भपात करणे, ऑपरेशन करणे, केवढा मोठा आत्याचार आहे! जर

एखादा जीव मनुष्यजन्म घेणारा असेल आणि त्याला तुम्ही थांबवाल तर तो हिंदू संस्कृती न मानणाऱ्या विधर्मीयांच्या घरी जन्माला येईल आणि हिंदूंचा नाश करील. विधर्मीलोकांची संख्या वाढली तर ते काय करतील? सर्वांचे कल्याण व्हावे असा प्रयत्न कोणत्या सांप्रदायामध्ये आहे? घोरातीघोर युद्धक्रियासुद्धा कल्याणकारी व्हावी—असा उपदेश गीतेने दिला आहे. महाभारत युद्धसुद्धा धर्मक्षेत्र असलेल्या "कुरुक्षेत्र" या ठिकाणी जाऊन केले गेले आहे, कारण त्या ठिकाणी मृत्यू झाल्याने कल्याण होते. युद्धासारखी क्रियासुद्धा त्या भूमीवर केली जावी ज्या ठिकाणी मेल्यास कल्याण होते—अशा प्रकारची जी संस्कृती प्रत्येक परिस्थितीत जीवाच्या कल्याणाचा उद्‌देश समोर ठेवते, अशा संस्कृतीत जीवाला जन्मूच न देणे केवढा घोर अपराध आहे? मी हे अभिमानाने सांगत नाही, परंतु मुद्‌दा अभिमानाचा आहे, त्यासाठी क्षमा मगतो. आज येथे सत्संगाचा जो समारोह होत आहे. रामचरितमानसच्या नवान्ह पारायणाचा कार्यक्रम होत आहे. अशाप्रकारचा संपूर्ण जीवांच्या उद्धारासाठी कार्यक्रम ख्रिश्चन, मुसलमान, यहूदी, पारसी इत्यादी संस्कृतीत होतो काय? कोठे होत असेल तर दाखवा! आपल्या सत्संग-आयोजनाचा, रामायण-पाठाचा उद्‌देश काय आहे? संख्या वाढविण्यासाठी, पैसा गोळा करण्यासाठी, यश-प्रतिष्ठेसाठी, मान-सन्मानासाठी, भोग-प्राप्तीसाठी, सांसारिक प्रगतीसाठी, कशासाठी हे आयोजन होत आहे?

श्रीरामचंद्रांनी शत्रूचेसुद्धा अनहित केले नाही—"**अरिहुक अनभल कीन्ह न रामा**" (मानस २।१८३।६). अंगदाला रावणाकडे पाठवतानाही असे सांगितले—"**काजु हमार तासु हित होई**" (६।१७।८). जो सीताजीचे हरण करून घेऊन गेला आहे आणि

मरायला-मारण्याला कंबर कसून तयार झाला आहे, त्याच्याकडेही दूताला यासाठी पाठवितात की, काम तर आपले व्हावे, आपणाला आपली पत्नी परत मिळावी, परंतु त्याचबरोबर त्याचेही हित व्हावे. ही गोष्ट कोण्या संस्कृतीत आहे? अशा संस्कृतीत जन्म घेण्याला बंदी घालणे केवढा मोठा भयंकर अन्याय आहे? शास्त्र ज्याला महापाप म्हणून सांगते, ज्या महापापाला तुम्ही जाणता, ते पाप तुम्ही आपली पूर्ण शक्ती लावून करीत आहात आणि सद्‌गतीची इच्छा करीत आहात, तर सद्‌गती कशी होईल?

दोन धनगर जातीची माणसे होती. दोघाजवळ गाय-म्हैस, शेळ्या-मेंढ्या इत्यादी खूप संपत्ती होती. त्यांना शेतीचेही उत्पन्न खूप होत होते. त्यापैकी एका परिवारातील एक स्त्री दुसऱ्या परिवाराशी वैर करीत होती. ती स्त्री त्यांच्या वाड्यात जाऊन वैरण जाळून टाकत होती, त्यांच्या शेतीचे खूप नुकसान करीत होती, परंतु असे असतानाही तिचा परिवार मुले-नातवंडे, गायी-म्हशी, खूप वाढत होत्या। त्या स्त्रीचा पती म्हणत होता की, भगवंताच्या दरबारात फारच अंधार आहे. ती स्त्री दुसऱ्याचे अनिष्ट करते तरीही तिचा परिवार वाढतो. असे करता करता बरीच वर्षे गेली. आता त्या स्त्रीचे तरुण पुत्र मरू लागले. धन नष्ट झाले, शेती पिकणे बंद झाले. आता त्या स्त्रीचा पती म्हणाला की, भगवंताच्या दरबारात अंधार नसून उशीर आहे. वास्तविक पाहिले तर उशीरही नाही. भगवंताच्या विधानानुसार जे व्हावयास हवे असते ते समयानुसार होत असते. मनुष्याची दृष्टी संकुचित असते म्हणून त्याला उशीर लागत आहे असे वाटते.

पुष्कळ लोक अशी शंका घेतात की, जे धर्मानुसार आचरण करतात, ते दुःख भोगतात आणि जे पाप करतात त्यांची मोठ्या

प्रमाणावर प्रगती होते, आरामाने जगतात, सुख भोगतात. परंतु हे वर्म आत्ताच कळत नाही. जेव्हा परिणाम (फळ) समोर येईल तेव्हा कळेल. मात्र त्यावेळी रडण्याशिवाय दुसरे काही राहणार नाही.

**सो परत्र दुख पावइ सिर धुनि धुनि पछिताइ।**
**कालहि कर्महि ईस्वरहि मिथ्या दोस लगाइ॥**

(मानस ७।४३)

म्हणून अगोदर सावधान रहाल तर फार चांगले होईल. कमीत कमी जाणून-बुजून तरी महान अत्याचार, महान पाप करू नका.

पांडव जेव्हा वनात राहत होते, त्यावेळी द्रौपदीने युधिष्ठिर महाराजांना प्रश्न विचारला होता की, महाराज! आपण धर्माविरुद्ध एक पाऊलही टाकीत नाही, कोणाचेही अनिष्ट करीत नाही, परंतु अरण्यात भटकावे लागत आहे. अन्न, पाणी इत्यादीही जवळ नाही. कंद-मूळ फळे खाऊन निर्वाह करीत आहात. परंतु जो अन्यायच-अन्याय करीत आहे असा दुर्योधन खूप मजा मारीत आहे, राज्यकारभार चालवीत आहे. तर मग धर्म-कर्म काही आहे की नाही? ईश्वर काही न्याय करतो की नाही? त्यावेळी युधिष्ठिरजी म्हणाले—देवी! तुझ्या अंतःकरणात ही गोष्ट कशी काय उत्पन्न झाली? जो आपल्या स्वतःच्या सुख-सुविधेसाठी धर्माचे पालन करतो, तो धर्मतत्त्व जाणत नाही. धर्मतत्त्व तर तोच जाणतो जो कष्ट झाले तरीही धर्माचा त्याग करीत नाही. धर्माचे महत्त्व आहे, सुख-सुविधेचे नाही. सुख-सुविधेचे महत्त्व तर पशूतही आहे. मी सुख-सुविधा मिळण्यासाठी धर्माचे पालन करीत नाही. विचार करा! जर धर्माचे पालनही

आपल्या सुख-सुविधेसाठी केले जात नाही. तर मग त्या सुख-सुविधेसाठी गर्भपातासारखे भयंकर पाप जे करीत आहेत, त्यांची काय दशा होईल? गर्भपातातही विशेषरूपाने गर्भात स्थित असलेल्या कन्येला पाडून टाकतात, यापेक्षा महान भयंकर पाप दुसरे कोणते असणार?

मी स्वत: बोर्डावर लिहिलेले पाहिले आहे की, गर्भात मुलगा आहे का मुलगी—याची परीक्षा करा. याचा भाव असा आहे की, जर गर्भात मुलगी असेल तर गर्भ पाडून टाका. संसारात स्त्रियांपेक्षा पुरुषांना श्रेष्ठ दर्जा दिला गेला आहे, परंतु मातृशक्तीचा जो महीमा आहे, तो पुरुष शक्तीचा नाही. मातेचा दर्जा पित्यापेक्षा हजारपटीने अधिक मानला गेला आहे—

**सहस्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते॥**

(मनु० २।१४५)

प्रथम मातेचे नाव घेतले जाते, नंतर पित्याचे नाव घेतात. जसे राधेश्याम, सीताराम, लक्ष्मीनारायण, गौरीशंकर इत्यादी. कन्येला गर्भातून पाडून टाकणे हा त्या मातृशक्तीचा महान अपमान आहे. सर्व बंधू-भगिनी ज्या येथे बसल्या आहेत, त्या सर्व आईच्या कुशीतूनच जन्माला आल्या आहेत, बापाच्या कुशीतून जन्माला आल्या नाहीत. सर्वांचे पालन-पोषण मातेने केले आहे, बापाने केले नाही. सर्वांनी आईचे दूध पिले आहे, बापाचे दूध पिले नाही. गायीचे वासरू जेव्हा दूध पिऊ लागते, तेव्हा गाय वासराला चाटत राहते, वासराकडे बघत राहते, त्यामुळे वासरू हृष्ट-पुष्ट होते. जर त्या वासराला दुसऱ्या गायीचे दूध पाजले तर ते वासरू तसे पुष्ट होत नाही. कारण मातेच्या प्रीतीने, स्नेहाने वासराचे जे पालन होते ते केवळ दुधाने होत नाही. मातेचे फार

मोठे विलक्षण माहात्म्य आहे. तुम्ही आपल्या सुख-सुविधेसाठी लोभाला बळी पडून मातृशक्तीचा नाश करीत आहात, कन्येला गर्भातून पाडून टाकत आहात, हे फार मोठे पाप आहे. मातृशक्तीचा एवढा मोठा अपमान दुसरा कोणताही असू शकत नाही. गर्भात जी कन्या आहे, ती मातृशक्ती आहे. त्या मातृशक्तीला गर्भातूनच काढून टाकाल, त्या शक्तीला उत्पन्नच होऊ देणार नाहीत तर मग कोठे जन्माल? कोणाचे दूध प्याल? जन्म घेण्यासाठी कुस कोठून आणणार? कोण तुमच्यावर प्रेम करील? कोण हृदयाला लावील?

काशीचे विद्वान मदनमोहनजी महाराज म्हणत होते की, मी एकदा एकाच्या विवाह प्रसंगी गेलो होतो. त्यावेळी माता-भगिनीनी उत्तम वस्त्रे व अलंकार धारण केले होते. एका स्त्रीच्या मांडीवर लहान बाळ होते. ते बाळ शौच करू लागले होते. जवळ बसलेल्या दुसऱ्या स्त्रीने तिला सांगितले की, तुझे बाळ शौच करीत आहे, तेव्हा ती स्त्री म्हणाली—बाई! तुम्ही चूप रहा, मोठ्याने बोलू नका, नाहीतर बाळाचे शौच करणे थांबेल जाईल. अशी दया मातेशिवाय कोणात आहे सांगा? उत्तम रेशमी साडी खराब होत आहे, परंतु तिकडे तिचे लक्ष नाही, तर मुलाचे शौच करणे थांबले जाईल तर बाळ आजारी पडेल इकडे लक्ष आहे. केवढी विलक्षण गोष्ट आहे! त्या मातृशक्तीचा एवढा अपमान, एवढा तिरस्कार की, तिला गर्भातूनच नष्ट करून टाकले जावे! तुमचे पालन कोण करील? कोण रक्षण करील? कोण गर्भात धारण करील? आजकाल पुरुष आणि स्त्री या दोघांना सारखा अधिकार असला पाहिजे असे बोलले जाते, तर मग स्त्रीप्रमाणे पुरुषांनीही गर्भधारणा केली पाहिजे. वास्तविक स्त्रियांचा समान अधिकार नाही उलट उच्च अधिकार आहे. कारण त्या माता

आहेत माता! साधूंच्या पुष्कळ इमारती असतात, परंतु त्यांना गृहस्थीची घरे म्हटली जात नाहीत. घर तर स्त्रीमुळेच म्हटले जाते. म्हणून शास्त्रात आले आहे—

**न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते।**

(महाभारत शांती० १४४।६)

अर्थात घराचे नाव घर नाही, उलट स्त्रीमुळेच (गृहिणीमुळेच) घर म्हटले जाते. पुरुष बाजारात नथ खरेदी करतो, परकर खरेदी करतो. त्यावेळी त्याला एखाद्याने विचारले की, आपण स्वतः नथ वापरता काय? तो म्हणेल मी वापरणार नाही, मला घरच्यासाठी पाहिजे आहे. गृहलक्ष्मीच मुख्य घर आहे. सून जेव्हा घरी येते तेव्हा माता-भगिनी सूनबाई घरी आल्या असे म्हणू लागतात. आता घर तिचे आहे. लोक बढाया मारतात की, स्त्री जातीचा फार अपमान केला गेला आहे. आम्ही आता तिचा सन्मान करीत आहोत. वास्तविक आत्ता जेवढा स्त्री-जातीचा अपमान होत आहे, तेवढा पूर्वी कधीच झाला नाही. स्त्री जातीच्या सन्मानासाठीच महाभारत युद्ध झाले. स्त्री-जातीच्या रक्षणासाठीच श्रीरामचंद्रांनी रावणाशी युद्ध केले. स्त्री-जातीच्या सन्मानासाठीच भीष्माचार्यांनी आपला प्राण त्याग केला, परंतु शिखंडीवर (जो पूर्वी स्त्री होता, वर्तमानात नव्हे) बाण सोडले नाहीत. परंतु आज स्त्रीच्या मातृशक्तीला (कुटुंब नियोजनद्वारा) नष्ट करून तिला केवळ भोग्य वस्तू बनविले जात आहे. गर्भात निर्माण झालेल्या कन्येला पाडून टाकले जात आहे. हा काय स्त्री जातीचा सन्मान आहे? हा तर स्त्री जातीचा घोर अपमान आहे.

कन्येला गर्भातून काढून टाकाल तर पुढे काय दशा होईल? लग्न कोणाशी लावाल? तुमचा गृहस्थी धर्म कसा चालेल?

मुलीसाठी पैसे मोजावे लागतील. माझ्या लहानपणची गोष्ट मला आठवते. त्यावेळी जेव्हा व्यापाऱ्यांच्या घरी कन्येचा जन्म होत होता, तेव्हा ते म्हणत होते की, पैशाचे गाठोडे जन्माला आले. परंतु आज असे म्हणत आहेत की, हे संकट (दगड) आले आहे. या दोन्ही गोष्टी माझ्या पाहण्यात आल्या आहेत. पैशाचे गाठोडे यासाठी म्हणत होते की, विवाहात आपल्याला पैसा मिळणार. आता तीच स्थिती पुढे होईल.

ही गोष्ट ऐकून फार आश्चर्य वाटते की, माणसांची संख्या अधिक झाली तर सर्व लोकांना अन्न कसे पुरणार? ही गोष्ट जिथे पूर्वीपासूनच अन्न सीमित असेल आणि पुढे अन्न उत्पन्न होण्याची शक्यता नसेल, तिथेच लागू होते. अशा परिस्थितीत म्हणू शकले असते की, बाबांनो! अन्न तर इतकेच आहे परंतु लोकसंख्या वाढत राहिली तर सर्वांना कसे पुरेल? परंतु अशी गोष्ट नाहीच. लोकसंख्या वाढत आहे तर अन्नही खूप अधिक उत्पन्न होत आहे. ज्याठिकाणी अधिक वृक्ष असतात, तेथे पाऊस अधिक होतो. माणसे अधिक उत्पन्न झाली तर काय अधिक अन्न उत्पन्न होणार नाही? परंतु सध्या दुष्काळ का पडत आहे? माणसांनी पशू आहार सुरू केला आहे. त्या कारणाने दुष्काळ पडत आहे. मनुष्याला अन्नाची आवश्यकता राहिली नाही आणि पशूंना गवताची गरज राहिली नाही, तर मग पावसाची काय आवश्यकता आहे? आजकाल शेती व्यवसाय करताना शेतीचे उत्पन्न अधिक वाढावे म्हणून जीव जंतूंना नष्ट केले जाते, किटकांना मारले जाते, उंदीर मारले जातात, पक्ष्यांना मारले जाते, लहान-सहान जीव-जंतूंना मारले जाते. आज अन्नाचा काय भाव आहे? पूर्वी जीव-जंतूंची हत्या केली जात

नव्हती त्यावेळी धान्याचा काय भाव होता आणि आज काय भाव आहे? हिंसेचा परिणाम फार भयंकर होत असतो. यावेळी जर आपण दुर्बालांना मारत आहात तर ते केव्हातरी सबल होऊन तुम्हाला मारतील. म्हणून सज्जनहो! कृपा करा, गर्भापात करू नका, भ्रूणहत्या करू नका.

सिद्धांताची गोष्ट अशी आहे की, जो पुरुष उत्तम वस्तूचा तिरस्कार करतो, त्याला ती वस्तू पुनः कधीही मिळत नाही. जो मनुष्य अन्नाचा तिरस्कार करतो, अन्न विनाकारण नष्ट करतो, भोजन करताना पात्रात उष्टे टाकतो, त्याला पुढे अन्नाविना उपवाशी मरावे लागेल, मग ते या जन्मात होईल अथवा पुढील जन्मात! जो पाण्याचा गैरवापर करतो, त्याला पाण्याविना मरावे लागेल. जो नोकर योग्य असलेल्या मालकाचा त्याग करतो, अपमान करतो, प्रामाणिकपणे नोकरी करीत नाही, त्याला पुन्हा चांगला मालक मिळणार नाही. जो मालक प्रामाणिक नोकराचा तिरस्कार करतो, त्याला पुन्हा केव्हाही प्रामाणिक नोकर मिळणार नाही. अधिकारी संत महात्म्यांची भेट झाली असताना त्यांचा तिरस्कार कराल, त्यांचे म्हणणे ऐकणार नाहीत तर पुन्हा तुम्हाला अधिकारी संत मिळणार नाहीत. तुम्हाला मनुष्यजन्म जरी पुन्हा प्राप्त झाला तरीही अधिकरी संत मिळणार नाहीत, कारण तुम्ही त्यांचा तिरस्कार केला आहे. मनुष्यजन्म व्यर्थ नष्ट केला त्याला उत्तम कार्यामध्ये लावले नाहीत, तर पुन्हा तुम्हाला मनुष्यशरीर मिळणार नाही. त्याचप्रमाणे गर्भपात कराल, मनुष्यशरीराचा तिरस्कार कराल तर पुढील जन्मात संतानासाठी रडत बसावे लागेल. एका संतांना कोणी एकाने विचारले की, ह्या स्त्रीला संतान झाले नाही, काय कारण आहे? त्यांनी म्हटले की, हिने

पूर्वजन्मी बाळाची हत्या केली आहे, म्हणून हिला मुल झाले नाही आणि यापुढेही होणार नाही. त्या स्त्रीला या जन्मी मुल झालेच नाही. हे मला माहीत आहे, खरी गोष्ट आहे पण नाव सांगत नाही. जर कोणी म्हणेल की, गर्भपात करणाऱ्याला संतान होते तर हे त्याच्या पूर्व जन्मात केलेल्या कर्मांचे फळ आहे. या जन्मात केलेल्या गर्भपातरूपी महान पापाचे फळ त्याला पुढील जन्मात भोगावेच लागेल. मागील वर्षात उत्पन्न झालेले धान्य तर आपण आज खातो परंतु जर वर्तमानकाळात शेती केली नाही तर पुढील वर्षात खाण्यासाठी धान्य कसे मिळेल? आता केलेल्या पापांचा भयंकर परिणाम भोगावा लागेल. म्हणून पापापासून आपल्याला वाचवा आणि असे घोर पाप करू नका.*



* हा विषय उत्तम रीतीने समजून घेण्यासाठी गीताप्रेसद्वारा प्रकाशित झालेले "महापापसे बचो" पुस्तक वाचावे.

# २. हुंडा-पद्धतीपासून हानी

एकाने असा प्रश्न केला आहे की, जाणीव नसताना नसबंदी करवून घेतली असेल तर त्याला कोणते प्रायश्चित्त आहे? या विषयामध्ये जोधपूरच्या एका डॉक्टरने असे म्हटले आहे की, नसबंदी पुन्हा परत काढून घेता येते आणि कसल्याही प्रकारचा त्रास होत नाही. ज्यांनी अशी नसबंदी परत काढून घेतली आहे त्यांना पुन्हा संतानही झाले आहे. म्हणून चांगल्या डॉक्टरकडून पुन्हा नसबंदी काढून घ्यावी. याचे प्रायश्चित असे आहे की, आता यापुढे पुन्हा नसबंदी करवून घेणार नाही आणि त्याचबरोबर दुसऱ्यांनाही असे करण्याविषयी सल्ला देणार नाही असा दृढ निश्चय करावा. खरा पश्चात्ताप झाला तर प्रायश्चित्त होते अर्थात माझ्याकडून चूक झाली, आता यापुढे अशी चूक कधीही करणार नाही असे म्हणून भगवंताची क्षमा मागावी आणि यानंतर तशी चूक पुन्हा करू नये म्हणजे प्रायश्चित होते.

कर्मांचे संपूर्ण फल भोगून मुक्त होता येईल—ही गोष्ट अशक्य आहे. जेव्हा केव्हा मुक्ती होत असते, ती भगवत्कृपेनेच होत असते, त्यांनी क्षमा केल्यामुळेच मुक्ती प्राप्त होते. भगवत्कृपेने काय होऊ शकत नाही? प्रमाणिकपणे अंतःकरणपूर्वक पश्चात्ताप झाल्यास भगवंत अपराध क्षमा करतात.

दुसरी गोष्ट अशी आहे की, कित्येक लोक गर्भपात, भ्रूणहत्या यामुळे करतात की, मुली जर अधिक जन्माला आल्या तर हुंडा द्यावा लागेल आणि हुंड्यासाठी पैसा कोठून आणावा? जर धनवान माणसे कृपा करतील आणि हुंडा घेणे सोडून देतील तर हे महापाप (भ्रूणहत्या) समाप्त होऊ शकते. धनवान

माणसानाच हुंड्याची भूक अधिक असते. ज्यांच्या जवळ अधिक संपत्ती आहे तेच जास्त अन्याय करतात. म्हणून कृपा करून कमीत कमी ही गोष्ट मान्य करा, दुसऱ्याकडून काहीही घेण्याची इच्छा ठेवू नका. जरी आम्ही दुसऱ्यांनी दिलेले भोजन करतो, दुसऱ्यांनी दिलेले वस्त्र परिधान करतो, दुसऱ्यांची पुस्तके वाचतो, दुसऱ्यांच्या इमारतीत राहतो, दुसऱ्यांच्या पैशाने प्रवास करतो, तरी पण हे देणाऱ्याच्या मर्जीवर अवलंबून आहे. आम्ही दुसऱ्याची वस्तू घेण्याची इच्छा ठेवत नाही.

आम्ही संतांकडून असे ऐकले आहे की, पाच प्रकारच्या वृत्ती (भिक्षा) पैकी सर्वात उत्तम माधुकरी वृत्ती आहे. उत्तम का आहे ? तर त्यात देणाऱ्यांची प्रसन्नता असते. ज्यात देणाऱ्यांची प्रसन्नता असते, ती वस्तू पवित्र असते. ज्यात घेणाऱ्याची इच्छा असते, ती वस्तू पवित्र नसते. माझ्यासमोर एकाने एका संतांना प्रश्न विचारला की, सर्वात उत्तम भोजन कोणते आहे ? त्यावेळी संतांनी उत्तर दिले की ज्यात खाणाऱ्यापेक्षा खाऊ घालणाऱ्याला अधिक आनंद होतो, ते भोजन सर्वात उत्तम समजले जाते. खाणारा आणि खाऊ घालणारा दोघेही प्रसन्न असतात, ते भोजन मध्यम दर्जाचे समजावे. ज्यात खाणाऱ्याला अधिक आनंद होतो, खाऊ घालणाऱ्याला होत नाही, ते भोजन सर्वात निकृष्ट समजावे. वाघ गायीला मारून खातो तर त्यावेळी गायीला आनंद होतो काय ? ही तर मोठी हत्या आहे.

**सहज मिले सो दूध सम, माँग लिया सो पानि।**
**खैंचातानी रक्त सम, यह संतों की बानि॥**

सहज प्राप्त झालेली वस्तू दुधाप्रमाणे असते आणि मागून घेतलेली वस्तू पाण्यासारखी असते. परंतु जेथे जबरदस्ती असते की, आम्ही तर इतका पैसा घेऊ; तर असे करणे म्हणजे दुसऱ्याचे

रक्त प्राशन करणे होय. अशा पैशांनी भले होणार नाही. थोड्या काळा-पुरते भले वाटेल पण परिणाम फार भयंकर होईल!

**अन्यायोपार्जितं द्रव्यं दशवर्षाणि तिष्ठति।**
**प्राप्ते चैकादशे वर्षे समूलं तद्विनश्यति॥**

(अन्यायाने कमावलेले धन दहा वर्षापर्यंत राहते आणि अकरावे वर्ष सुरू होताच ते मुळासकट समाप्त होते.)

अन्यायपूर्वक जे धन मिळविले जाते त्याचा अवधी दहा वर्ष मानला गेला आहे. त्याला थोडी न्यायाची साथ असल्यास ते काही अधिक वर्ष टिकू शकते परंतु अवधी पूर्ण होताच ते समूळ नष्ट होईल. ज्याप्रमाणे तलावामध्ये दरवाजा (अधिक झालेले पाणी काढण्याचा मार्ग) ठेवला जातो तेव्हा तलाव भरलेला राहतो. जर दरवाजा ठेवला नसेल तर अधिक पाणी जमा झाल्यास तो फुटून जातो आणि तलाव रिकामा होऊन जातो. त्याचप्रमाणे जो धन कमावतो आणि दान-पुण्य करीत नाही, तो निश्चितच दरिद्री होईल. त्याला कोणीही वाचवू शकणार नाही. पूर्वपुण्य जास्त असेल तर काही दिवस भलेही चांगले जातील, परंतु अंती दुर्दशा होईल, यात कोणताही संशय नाही.

दुसऱ्याचे मन दुखवणे फार मोठे पाप आहे. ''**दिल किसीका मत दुखा, दिल खुदा का नूर है!**'' हृदयामध्ये भगवंताचा निवास आहे. म्हणून कोण्याही जीवाचे मन दुखविणे योग्य नाही. गाय आपली माता आहे. तिचे आपण दूध पितो तर ते वस्त्राने गाळून पितो की, त्यात एखादा केस येऊ नये. एखादा जरी केस तुटला तर गायीला दुःख होत असते. जे प्रसन्नतेने मिळत असते ते दूध असते आणि जे अप्रसन्नतेने प्राप्त होते ते रक्त असते. म्हणून हुंड्याचा आग्रह धरणे फार मोठे पाप आहे.

एक मुलगा होता. तो जेव्हा स्वत:चे शिक्षण संपवून विद्वान झाला तेव्हा त्याला आपली मुलगी देण्यासाठी बरीच मंडळी येऊ लागली. परंतु त्याने कोणाशीही संबंध करण्याचे स्वीकारले नाही. शेवटी त्याने आपल्या गोत्रातील एका आंधळ्या मुलीशी लग्न लावले. त्याच्या मित्रांनी त्याला असे न करण्याविषयी पुष्कळ समजावून सांगितले परंतु तो म्हणाला की, मी तर अशा मुलीशी संबंध करू इच्छितो जिची मला सेवा करता येईल. मला सेवा घेण्यासाठी लग्न करावयाचे नाही तर सेवा करण्यासाठी संबंध करावयाचा आहे. स्वयंपाक करणे, कपडे धुणे इत्यादी कार्य तो स्वत:करीत असे. त्याला मुले-बाळेही झाली. अशा प्रकारे त्याचे दांपत्य-जीवन सुखात गेले. ही गोष्ट मनुष्यच करू शकतो, पशू करू शकत नाही. कुत्रे एकमेकाशी प्रेमाने खेळत असलेले दिसतात, परंतु भाकरीचा तुकडा समोर येताच भांडण सुरू होते. त्याचप्रमाणे मनुष्यातही स्वार्थ बोकाळला तर मात्र माणसाचे फारच पतन होते.

एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, जितके तुम्ही कमावता तितके तुम्ही खर्च करूच शकत नाही. तुम्ही जो संग्रह करता तो सर्व तुमच्या कामाला येणारच नाही. परंतु जेवढे पाप झाले आहे, ते सर्व तुमच्याबरोबर येईल, थोडेही मागे राहणार नाही. या ठिकाणी राहणाऱ्या धनासाठी बरोबर येणारे पापाचे गाठोडे बांधणाऱ्याला बुद्धीमान म्हणाल तर मग निर्बुद्ध कोणाला म्हणाल? आता तर मजा वाटते परंतु परिणामी दुर्दशा होईल! "**पडेगा काम दूतोंसे, धरेंगे मार जूतोंसे!**" म्हणून कृपा करून विचार करा की आत्तापर्यंत झाले ते झाले आता पुढे असे काम करणार नाही, कोणालाही जबरदस्ती करून कधीही काहीही घेणार

नाही. कोणाकडून जबरदस्तीने पैसे काढणे, डाका घालणे, चोरी करणे फार मोठे पाप आहे. या पापातून केव्हा मुक्त व्हाल? तो कोणता दिवस उजाडणार आहे ज्या दिवशी आपण पापापासून मुक्त व्हाल?

मुलाकडील मंडळी आम्हाला एवढा हुंडा मिळाला पाहिजे अशी मागणी करतात. मुलीचा बाप स्वतः काहीही बोलू शकत नाही. तो दुसऱ्याकरवी निरोप देतो की, माझी ही कन्या आहे, मुलाकडील मंडळींनी स्वीकार केला तर चांगले होईल. मुलाकडील मंडळी प्रश्न करतात की, हुंडा किती द्याल? त्यावेळी तो मुलीचा बाप म्हणतो दहा हजार रुपये देईन. त्यावेळी ती मंडळी म्हणतात की, दुसरे तीस हजार देऊ लागले होते पण आम्ही घेतले नाही. आता मुलाचा लीलाव होत आहे. पन्नास हजाराची बोली झाली आहे. जो देईल तो मुलगा मिळवील. अशा प्रकारे मुलाचा लीलाव करणे काय मानवता आहे? थोडा तरी विचार करा. घरच्या मुलाची किंमत ठरवीत आहात—जो जास्तीत जास्त पैसे देईल त्याला मुलगा मिळेल. अशा परिस्थितीत मुलीच्या बापाने एवढा पैसा कोठून आणावा? तो बिचारा काय करील? हे संकट धनी लोकांनी निर्माण केले आहे. धनी लोकच धनाचे अधिक भुकेले असतात. गरीब एवढे भुकेले नसतात. "**को वा दरिद्रो हि विशालतृष्णः**" तहान कोणाला जास्त असते? जो खूप पाणी पितो तोच अधिक तहानलेला असतो. त्याचप्रमाणे अधिक दरिद्री कोण आहे? जो जास्त धनवान आहे, तोच जास्त दरिद्री आहे. कारण त्यांची भूक फारच अधिक असते. धनवानाला तोटाही लाखानी होतो परंतु गरीबांना तेवढा तोटा येत नाही. धनीलोक म्हणत असतात की, काय करावे आजकाल

उत्पन्न घसरले आहे. जवळ जवळ फक्त दहा हजार रुपये भाड्याचे येतात, येवढे व्याज येते, तेवढे व्यापारातून उत्पन्न होते. आजकल उत्पन्नात घट झाली आहे. यावरून ते किती मोठे दरिद्री आहेत की, त्यांना येवढे उत्पन्न कमीच दिसते. थोडे उत्पन्न तर त्यांना उत्पन्नच वाटत नाही आणि तोटा होतो लाखो रुपयांचा! ते दानसुद्धा जेवढे गरीब करतात तेवढे करू शकत नाहीत. दहा-वीस हजार रुपये दान केले, अथवा लाख रुपये दान केले, परंतु मागे किती रुपये शिल्लक पडलेले आहेत? एका गरीब माणसाजवळ पाच रुपये आहेत. एखादेवेळी प्रसंग पडल्यास तो भुकेल्या गायीसाठी तो त्या पाच रुपयापैकी एक रुपया सुखपूर्वक देऊन टाकील. शंभर रुपये बाळगणारा माणूस सुखपूर्वक वीस रुपये देऊ शकतो काय? हजार रुपये असणारा दोनशे रुपये देऊ शकतो काय? लाख रुपये असणारा वीस हजार रुपये देऊ शकतो काय? त्याला खूप त्रास दिल्यावर किंवा दु:ख दिल्यावरही देणार नाही, तर मग सुखपूर्वक कसा देईल? पाच रुपये असणारा जेव्हा एक रुपया देतो तेव्हा त्याच्या निर्वाहात अडचण निर्माण होते, परंतु लाख रुपये असणाऱ्याने जर वीस हजार रुपये दिले तर त्याच्या निर्वाहात अडचण येत नाही. कारण मागे ऐंशी हजार रुपये शिल्लक आहेत. म्हणून गरीबाच्या दानासमान धनवानाचे दान होऊ शकत नाही. भगवंत रुपयाची संख्या बघत नाहीत.

**सत्त सारु दत्त बाँटिये, ''नापो'' कहत नरां।**
**निपट नकारो न दीजिये, उणत देख घरां॥***

* नापो कवि म्हणत आहेत की, हे मनुष्यानो! आपल्या शक्तीनुसार दान करा. घरात अभाव पाहून एखाद्याला साफ ''ना'' म्हणू नका, तर काहीना काही द्या.

शक्तीनुसार दान केले पाहिजे. तर काय धनवान शक्तीनुसार दान करतात? लोक पाहतात की, कोणी जास्त दान दिले. वास्तविक जो अधिक संख्येने दान करतो, तो दानी नव्हे. जो साधारण स्थितीतही दान करतो तो दानी आहे. जवळ एक भाकरी आहे आणि त्यातून अर्धी भाकरी देतो, तो दानी आहे. ज्याच्याजवळ अमाप धन आहे त्याने लाख दोन लाख रुपये दिले तर काय झाले? जेवढे गरीबाचे दान होते तेवढे श्रीमंताचे दान होत नाही अन्यायसुद्धा धनवान माणसेच करतात. संपूर्ण बाजार तेज करून टाकतात. माल खरेदी करून साठवतात आणि तेजीत विक्री करतात. त्यांच्या हातात एकदा सर्व माल आला की, ते मनमानी करतात. ते भयंकर मोठ्या प्रमाणात अनर्थ करतात. मी आपणाला दुखवण्याच्या उद्देशाने ही गोष्ट सांगत नाही, उलट तुम्हाला नेहमी सुखी करण्याच्या नियतीने, नरकाच्या महान दंडापासून वाचविण्यासाठी ही गोष्ट सांगत आहे. जर तुम्ही अन्यायपूर्वक पैसा कमविला नाही, दुसऱ्यांचे मन दुखवले नाही, तर तुम्ही नेहमीसाठी सुखी व्हाल.

ही भ्रूणहत्या का होत आहे? या धनवान माणसांमुळे! कारण ते हुंडा अधिक मागतात. स्त्रियांना मिठाई, फळे इत्यादी सामानाची अधिक इच्छा असते आणि पुरुषांना पैसा अधिक हवा असतो. ही भूक फार वाईट आहे. कोणत्याही प्रकाराने का होईना ही भूक समाप्त करा. सून जेव्हा मिठाई थोडी आणते तेव्हा सासू तिला म्हणते—एवढी मिठाई माझ्या परिवाराला कशी पुरेल? कोणा कोणाला द्यावी? अशाप्रकारे ती सासू, सून आणि तिच्या आईची निंदा करते. काही दिवस सासूचे तर काही दिवस सूनेचे असतात. मग पाहून घ्या तमाशा. मग म्हणाल सून माझे ऐकत

नाही. तुम्ही सूनेचा किती आदर केला? तिने मिठाई अधिक आणावी—या लोभाने तिचा किती तिरस्कार केला? समजा जर मिठाई कमी आली असेल तर हे लोकांना सांगू नका, ही गोष्ट लपवून ठेवा, कोणाच्याही कानावर जाऊ देऊ नका आणि तशीच मिठाई आपल्या घरी तयार करा. मग ती आणि ही मिसळून सर्वांना वाटा आणि मुलाच्या सासुरवाडीहून ही मिठाई आली आहे असे सांगा. तुम्ही कदाचित मला असे म्हणाल की, बाबाजी तुम्हाला म्हणायला काही लागत नाही, पण आम्हाला करण्यासाठी पैसा खर्च करावा लागतो. आम्ही म्हणतो की, चाळीस पन्नास शंभर रुपयेच तर लागतील, पण शंभर रुपयात सून खरेदी केली जाते, सून तुमची होते. सूनेवर या गोष्टीचा केवढा परिणाम होईल की, माझ्या आईचे महत्त्व राखण्यासाठी सासूने घरी मिठाई तयार करून वाटली. शंभर रुपयात एक मनुष्य जर खरेदी झाला तर स्वस्तच आहे, महाग काय आहे? पण लोभ सोडला तरच हे शक्य होईल. लोभ नरकाचा दरवाजा आहे (गीता १६।२१), याचा त्याग करा. लोभामुळे महान पाप होते. लोभी माणूस आंधळा होतो. पाहू शकत नाही.

लोभामुळे हुंडा इत्यादीपासून बचाव करून घेण्यासाठी कन्येचा गर्भ पाडून टाकणे हा स्त्री जातीचा घोर अपमान आहे. कन्येचा जन्म झाला तर म्हाताऱ्या स्त्रिया म्हणतात "दगड जन्माला आला दगड!" जर त्यांना आता विचारले की, अहो आजी! तुम्ही जेव्हा जन्मला होता तेव्हा रत्न आले होते का? तुम्ही सुद्धा दगडच होता. आज तुम्ही आजी बनलात तर कन्येचा तिरस्कार करता काय? कन्येचे दान होत असते, उत्सव होतो. कन्यादानाच्या दिवशी माता-पिता उपवाशी राहतात आणि कन्यादान

(विवाह) झाल्यावर भोजन करतात. कन्यादान एखादे सामान्य दान नव्हे. पुढच्या वंशवृद्धीरूपी इमारतीचा हा पाया आहे. आपली आवडती मुलगी—लक्ष्मीरूप कन्येला विष्णुरूप वराला वंशवृद्धीसाठी दिली जाते "**विष्णुरूपाय वराय सालङ्कारां सवस्त्रां लक्ष्मीरूपिणीं कन्यां सम्प्रददे**" अशा कन्येची गर्भातच हत्या करणे भयंकर मोठे पाप आहे. आपणा सर्वांना ही प्रार्थना आहे की, गर्भात कन्या असो अथवा पुत्र असो त्याला पाडू नका, त्याची हत्या करू नका. एक गोष्ट विशेष लक्ष देऊन ऐका. कन्या येईल तर आपले भाग्य घेऊन येईल. ती तुमच्या भाग्याच्या भरवशावर येणार नाही. अशी गोष्ट पाहण्यातही येते. एका गृहस्थाने मला सांगितले की, एकदा व्यापारात खूपच उत्पन्न झाले. जेव्हा कन्येचा विवाह झाला तेव्हा आण्यापैशासहित तेवढेच रुपये लागले. म्हणून कन्येचे भाग्य तिच्याबरोबरच येईल, तुम्ही घाबरून जाऊ नका. अगोदर कठीण वाटते परंतु समय येताच योग्य रीतीने विवाह होऊन जातो.

तुम्ही कन्यांचा गर्भ पाडून टाकाल तर मुलांचा विवाह कोणाशी करणार? ब्राह्मणांचा ब्राह्मणांशी, क्षत्रियांचा क्षत्रियाशी अनादिकालापासून विवाह होत आला आहे आणि मुलगा-मुलगी दोन्ही जन्मत आले आहेत. कन्या जर उत्पन्न झाल्या नाहीत तर वंश नष्ट होतील. रजपूत जातीत हुंड्याची पद्धती अधिक प्रचलित होऊ लागली तर त्यांनी कन्यांची हत्या करणे सुरू केले. त्यामुळे त्यांचे वंश नष्ट झाले. भागवत इत्यादीमध्ये जितक्या रजपुतांची कथा येते, तेवढे रजपूत आज पाहण्यात येत नाहीत. थोडा विचार तर करा! कन्येच्या हत्येने फार मोठा अनर्थ होईल. कन्येचा जन्म थांबवण्यासाठीच तर आपण गर्भपात करीत आहात

आणि विधवांचा विवाह सुरू करू इच्छित आहात. विधवा लग्न करण्याला तयार होऊ लागल्या तर कन्यांना वर कसे मिळतील? अगोदरच कन्यांचा विवाह होणे कठीण झाले आहे त्यात विधवा तयार केल्यास अधिक कठीण होईल. विधवा-विवाह तर शास्त्र दृष्ट्या निषिद्ध आहे. पितृऋणातून मुक्त होण्यासाठी संतान उत्पन्न करण्याची जबाबदारी पुरुषावर आहे. स्त्रीवर कसलीही जबाबदारी नाही. पुरुषानेही जर सुख लोलुपतेने दुसरा विवाह केला तर ते पाप होय. जो विवाहविना भोगांचा त्याग करू शकत नाही, त्याच्यासाठीच विवाहाचे विधान आहे. विवाह करणे काही फार मोठे काम नाही. त्यागाचे जितके महत्त्व आहे, तितके महत्त्व भोगांचे कधी झाले नाही, होऊ शकत नाही, संभवतच नाही. विधवांचा विवाह झाला पाहिजे म्हणतात. विधवांचा विवाह होऊच शकत नाही. ज्यात कन्यादान होत असते त्यालाच विवाह ही संज्ञा येते. आता विधवेचे दान कोणी करावे? विधवा विवाह वास्तविक विवाह नाहीच. हे एक नाते आहे, जे एका कुत्रा-कुत्रीमध्ये, गाढव-गाढवीमध्येही असते. ही काही आदराची, आदर्शाची थोडीच गोष्ट आहे? परंतु आज विधवांचा विवाह झाला पाहिजे असे लोक म्हणतात. त्याचप्रमाणे साधूदेखील सर्व मिळून म्हणतील की, साधूंचाही विवाह झाला पाहिजे, तर मग काय दशा होईल? संयम पाळण्याची काही तरी जागा राहू द्या. कृपा करून सन्मार्गावर या.

**प्रश्न**—हुंडा घेणे पाप आहे काय?

**उत्तर**—होय! हुंडा घेणे पाप आहे.

**प्रश्न**—जर पाप आहे तर मग शास्त्रात याचे विधान का आले आहे?

**उत्तर**—शास्त्रात केवळ वर दक्षिणा (हुंडा) देण्याचे विधान आहे, घेण्याचे विधान नाही. हुंडा घेऊ नये आणि न घेण्याचेच माहात्म्य आहे कारण वरदक्षिणा देणे आपल्या हातातील गोष्ट आहे वरदाक्षिणा (हुंडा) घेणे आपल्या स्वाधीन नाही.

इच्छा दोन प्रकारची असते(१) आपली वस्तू आपणाला मिळावी ही इच्छा न्याययुक्त आहे, परंतु परमात्मप्राप्तीत अशी इच्छा असणेसुद्धा बाधक आहे.(२) दुसऱ्याची वस्तू आपल्याला मिळावी ही इच्छा नरकात घेऊन जाणारी तसेच हुंडा घेण्याची इच्छा नरकात घेऊन जाणारी आहे. वरदक्षिणा (हुंडा) कमी मिळो अधिक मिळो अथवा न मिळो, ही गोष्ट प्रारब्धावर अवलंबून आहे, परंतु अन्यायपूर्वक दुसऱ्यांचे धन मिळविण्याची जी इच्छा आहे, ती इच्छा घोर नरकात घेऊन जाणारी आहे. मनुष्यशरीर प्राप्त करून घोर नरकात जाणे केवढे मोठे नुकसान आहे, पतन आहे. म्हणून मनुष्याने कमीत-कमी घोर नरकात घेऊन जाणाऱ्या इच्छेचा, दुसऱ्याच्या धनाच्या इच्छेचा तर त्यागच केला पाहिजे.

वास्तविक पाहता, धन तर प्रारब्धानुसारच मिळत असते, केवळ इच्छा केल्याने मिळत नाही. जर केवळ इच्छेने धन प्राप्त झाले असते तर कोणीही निर्धन राहिला नसता. धनाची इच्छा कधीही कोणाचीही पूर्ण झाली नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही. त्याचा तर त्यागच करावा लागेल. धन मिळणारे असेल तर इच्छा केली नाही तरीही ते सुगमतेने मिळते आणि इच्छा केल्याने कठीणतेने, पाप-अन्यायाने मिळते. गीतेत अर्जुनाने विचारले की, इच्छा नसतानाही मनुष्य पाप का करतो? त्यावर भगवंतांनी उत्तर दिले की, कामनाच संपूर्ण पापांचे मूळ आहे. (३। ३६-३७)

पूर्वीच्या काळात मुलाच्या सासुरवाडीकडून आलेला पैसा बाहेरच, वाटून दिला जात होता, तो पैसा आपल्या घरात ठेवत नव्हते. "दुसऱ्यांची कन्या आपण दान घेतली आहे" त्यासाठी प्रायश्चित्त म्हणून यज्ञ, दान, ब्राह्मण-भोजन इत्यादी करत होते. कारण दुसऱ्यांची कन्या दान घेणे फार मोठे कर्ज (ऋण) आहे. परंतु गृहस्थाश्रमात कन्या दानरुपाने घ्यावीच लागते, म्हणून त्यांचा असा भाव राहत होता की, आपल्या घरीही कन्या जेव्हा जन्माला येईल तेव्हा आपणही कन्यादान करू.

जे ब्राह्मण विधि-विधानयुक्त गाय इत्यादीचे दान घेतात, ते देखील त्यासाठी प्रायश्चित्तरूपाने यज्ञ, गायत्री-जप करतात— असे आम्ही पाहिले आहे. जर दुसऱ्यांचे धन घेणेसुद्धा दोष आहे, तर मग हुंड्यामध्ये पैसे घेणे दोष आहेच.जर वरदक्षिणा (हुंडा) घ्यावीच लागली तर केवळ देणाऱ्याच्या इच्छापूर्ती आणि प्रसन्नतेसाठीच स्विकारावी. आपली स्वत:ची थोडीही इच्छा नसेल आणि केवळ देणाऱ्याच्या प्रसन्न्तेसाठीच थोडेसे स्वीकारले गेले असेल तर ते घेणेसुद्धा देण्यासमानच आहे.



# ३. ढोल, अडानी, शूद्र, पशू, स्त्री

एखाद्या ग्रंथात आलेल्या एखाद्या विषयावर विचार करावयाचा असेल तर प्रथम त्या ग्रंथाला वाचावे. ज्या प्रसंगात ती गोष्ट आली असेल तो प्रसंग वाचावा आणि समजून घ्यावा. एकदा मला एका कॉलेजमध्ये जाण्याचा प्रसंग आला. त्यावेळी माझ्या स्वभावानुसार मी म्हटले काय सांगू? त्यावेळी एका सुशिक्षित स्त्रीने मला म्हटले की, गोस्वामीजीनीं स्त्री-जातीची फार निंदा केली आहे आणि म्हटले आहे—***"ढोल गवाँर सूद्र पसु नारी। सकल ताडना के अधिकारी॥"***

मी त्या स्त्रीला म्हटले की, ही चौपाई कुठे आली आहे? तिने सांगितलेकी, रामायणात आली आहे. पुनः विचारले की, रामायणात कोणत्या कांडात आली आहे? तिने सांगितले की, अयोध्याकांडात आली आहे. कोण्या प्रसंगात आली आहे? तेव्हा तिने सांगितले ज्या ठिकाणी स्त्रियांचे वर्णन आहे, त्याठिकाणी आली आहे. त्यावेळी मी म्हणालो की, हे बघा! तुम्ही सुशिक्षित आहात, पदवीधर आहात. सुशिक्षित व्यक्तीनी जे काही बोलावयाचे असेल ते योग्य रीतीने बोलावे. ज्या व्यक्तीला आपली स्वतःची प्रतिष्ठा सांभाळावयाची असेल त्याने मागचा पुढचा विचार करून बोलले पाहिजे—

**बैठ सभा बिच मूँडे बाहर, वचन काढि जे सोच-बिचार।**

आपली जर एखादी शंका असेल तर प्रथम त्या मूळ ग्रंथाचे अवलोकन करावे की, हा विषय कोठे आला आहे? गोस्वामीजीनीं कोणाच्या मुखातून उच्चार करविला आहे? कोण बोलते आहे? कमीत कमी एवढा विचार करा आणि मग शंका करा. काहीही

विचार न करता एकदम गोस्वामीजींवर ठपका ठेवणे की, त्यांनी स्त्री-जातीवर टीका केली आहे, ही फार मोठी चूक आहे— ***"निज अग्यान राम पर धरहीं"*** (मानस ७।७३।९)

जर पुरुष-जात स्त्री-जातीवर टीका करीत असेल किंवा स्त्री-जात पुरुष-जातीवर टीका करील तर ते दोन्हीही बेईमान आहेत. स्वतःची जात श्रेष्ठ समजणे आणि दुसऱ्याची जात कनिष्ठ समजणे मानवता नव्हे. गोस्वामीजी सीताजीच्या चरणाची वंदना करताना म्हणतात—

**जनकसुता जग जननि जानकी।**
**अतिसय प्रिय करुनानिधानकी॥**
**ताके जुग पद कमल मनावउँ।**
**जासु कृपाँ निरमल मति पावउँ॥**

(मानस बाल० १८।७-८)

ते स्त्री-जातीची निंदा कशी करू शकतात? भला माणूस दुसऱ्याची निंदा करू शकत नाही, उलट स्वतःची निंदा करू शकतो की, हे बघा, मी तर असा नादान आहे. पार्वतीजी शंकरजींना म्हणते—

**जासु भवनु सुरतरु तर होई। सहि कि दरिद्र जनित दुखु सोई॥**
**ससिभूषन अस हृदयँ बिचारी। हरहु नाथ मम मति भ्रम भारी॥**

× × × × ×

**जदपि जोषिता नहिं अधिकारी। दासी मन क्रम बचन तुम्हारी॥**
**गूढ़उ तत्त्व न साधु दुरावहिं। आरत अधिकारी जहँ पावहिं॥**
**अति आरति पूछउँ सुरराया। रघुपति कथा कहहु करि दाया॥**

(मानस बाल० १०८।११०)

पार्वतीजीच्या शब्दात किती विनम्रता आहे. त्यांनी आपल्याला

मोठे म्हटले नाही. भला माणूस कधीही स्वत:ला मोठे आणि दुसऱ्याला कनिष्ठ म्हणत नाही. जर एखादा ब्राह्मण भला असेल तर तो कधीही क्षत्रिय, वैश्य, शूद्रावर टीका करणार नाही. जर शूद्र भला माणूस असेल तर तो कधीही ब्राह्मणावर आक्षेप घेणार नाही. आजकाल जे दुसऱ्यावर आक्षेप घेतात, ब्राह्मणावर आक्षेप घेतात, साधूंवर आक्षेप घेतात, ते स्वत: कसे असतील याचा अंदाज लावा. ती भली माणसे असू शकत नाहीत.

व्यक्तींमध्ये सर्व प्रकारच्या व्यक्ती असतात. स्त्रियांमध्ये सीताजीही आहे आणि शूर्पणखाही आहे पुरुषांमध्ये श्रीरामचंद्रही आहेत आणि रावणही आहे. ग्रंथामध्ये सर्व प्रकारचे विषय येतात. परंतु त्या गोष्टी आपल्या जीवनात उतरविण्यासाठी येतात, आक्षेप घेण्यासाठी नव्हे. ते शिकवण देतात "**रामादिवद् वर्तितव्यं न तु रावणादिवत्**" अर्थात वर्तन करावयाचे असेल तर श्रीरामचंद्र इत्यादीप्रमाणे केले पाहिजे, रावण इत्यादीप्रमाणे करू नये.

श्रीरामचरितमानसच्या सुंदरकांडात असे येते—

**सभय सिंधु गहि पद प्रभु केरे। छमहु नाथ सब अवगुन मेरे॥**
**गगन समीर अनल जल धरनी। इन्ह कइ नाथ सहज जड़ करनी॥**
**तव प्रेरित मायाँ उपजाए। सृष्टि हेतु सब ग्रंथनि गाए॥**
**प्रभु आयसु जेहि कहँ जस अहई। सो तेहि भाँति रहें सुख लहई॥**
**प्रभु भल कीन्ह मोहि सिख दीन्ही। मरजादा पुनि तुम्हरी कीन्ही॥**
**ढोल गवाँर सूद्र पसु नारी। सकल ताड़ना के अधिकारी॥**

(५९।१-६)

ही गोष्ट समुद्र म्हणत आहे. समुद्र मनुष्यरूपाने भगवान श्रीरामचद्रांसमोर येतो आणि क्षमा मागतो. तो म्हणतो की "नाथ! आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी—हे पाचही तत्त्व जड

आहेत. जल असल्याने मीसुद्धा जड स्वभावाचा आहे. सृष्टीसाठी आपणच या पाच तत्त्वांना उत्पन्न केले आहे. ज्याला जशी आज्ञा दिली गेली आहे, तो त्यानुसार आपल्या मर्यादेत राहिल्याने सुख भोगतो. भगवंतांनी फार चांगले केले आणि मला शिकवण दिली. परंतु मर्यादा तर आपणच घालून दिली आहे. ढोल, अडानी, शूद्र, पशू आणि स्त्री हे सर्व ताडना अर्थात शिकवण देण्याला पात्र आहेत.''

समुद्र म्हणतो—''**मरजादा पुनि तुम्हरी कीन्ही**'' अर्थात ज्या मर्यादेमध्ये मी राहतो, ती मर्यादा आपणच बनविलेली आहे. म्हणून यामध्ये माझा दोष कोठे आहे? दोष तर आपल्यावरच येतो. मग म्हणतो की, ''**ढोल गवाँर सूद्र पसु नारी। सकल ताड़ना के अधिकारी॥**'' आता ''ताड़ना'' या शब्दावर विचार करावयाचा आहे की, याचा अर्थ काय होतो? समुद्राने जे म्हटले की ''**प्रभु भल कीन्ह मोहि सिख दीन्ही**'' अर्थात प्रभूने हे चांगले केले, की मला शिकवण दिली. तर या प्रसंगाने असे कळून येते की, ताड़ना, याचा अर्थ शिकवण आहे. चाणक्यनीतीमध्ये हा विषय आला आहे–

**लालयेत् पञ्च वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत्।**
**प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्॥**

जर बालकाला पाचव्या वर्षापासून मारू लागले तर तो बिचारा दहा वर्ष पूर्ण होण्यापूर्वीच मृत्युमुखी पडेल. म्हणून ''ताड़ना'' शब्दाचा अर्थ मारणे असा नसून, प्रत्यक्ष शिकवण देणे असा आहे. यात एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, ढोल, अनाडी, शूद्र, पशू आणि स्त्री—हे सर्व शिकवण देण्याचे अधिकारी आहेत. म्हणून यांना जर योग्य शिकवण मिळाली

नाही तर यांचा दोष नसतो, तर शिकवण देणाऱ्याचा दोष असतो. ढोल जर नीट वाजत नसेल तर ढोलाचा दोष नाही, वाजवणाऱ्याचा दोष आहे. अडानी जर योग्य नसेल तर तो ज्याच्या सान्निध्यात राहिला असेल त्या व्यक्तीचा दोष आहे. शूद्र जर योग्य रीतीने वर्तन करीत नसेल तर ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्यांचा दोष आहे. पशू ठीक नसेल तर त्याला शिकवण देणाऱ्याचा दोष आहे. बैल, घोडा, ऊंट इत्यादींना शिक्षण देत असताना त्यामध्ये काहीदोष आला, खराबी आली तर मग तो जन्मभर ठीक होत नाही. त्याचप्रमाणे स्त्री जर ठीक वर्तन करीत नसेल तर तिच्या माता-पित्याचा, पतीचा दोष आहे. तात्पर्य हे आहे की, हे सर्व शिकवणीचे अधिकारी आहेत. अधिकाऱ्याला शिकवण मिळाली नाही तर शिकवण देणाऱ्याचा दोष आहे. समाजात मी पाहिले आहे की, एखादी मुलगी लग्न झाल्यावर ज्यावेळी सासरी येते आणि तिला जर व्यवस्थित काम करता आले नाही तर असे म्हटले जाते की, तिच्या मातेने तिला चांगली शिकवण दिली नाही. काम तर मुलगी करीत नाही आणि बदनामी होत असते तिच्या आईची. म्हणून दोष मातेचा असतो, मुलीचा काय दोष आहे? म्हणून ढोल, अनाडी, शूद्र, पशू आणि स्त्री हे सर्व शिकवणीचे अधिकारी आहेत. आता जर यांना शिकवण मिळाली नाही तर त्यात यांचा काय दोष? परंतु ही गोष्ट समजून न घेणारे बुद्धिहीन लोक म्हणतात की, या चौपाईत स्त्री-जातीची निंदा केली गेली आहे. म्हणून यातून ''नारी'' शब्दाला काढून टाका आणि लिहा ***''ढोल गवाँर शूद्र पसु नारी। सकल ताड़ना के अधिकारी॥''*** स्वतःला तर बुद्धी नसते आणि दुसऱ्यावर ठपका ठेवतात. जर ''नारी'' च्या ऐवजी ''चारी'' शब्द घेतला

गेला तर मग "सकल" शब्द चुकीचा होईल. जी गोष्ट आपल्या मनोनुकूल नसेल, त्याला पुस्तकात बदलून टाकाल, ती गोष्ट काढून दुसरी लिहाल तर हा मोठा अपराध होईल. ही गोस्वामीजी महाराजांच्या वाणीची हत्या करणे आहे. सूक्ष्म दृष्टीने अवलोकन केल्यास वाणीची हत्या हे मनुष्याच्या हत्येपेक्षाही भयंकर मोठे पाप आहे. जी गोष्ट समजली नाही तिला चुक म्हणणे म्हणजे आपल्या बुद्धीचे अजीर्ण आहे. तत्त्व जर आवडले नाही तर पुस्तक बदलून टाका, गुरू पसंत आला नाही तर गुरूला बदलून टाका—असे जर होत राहिले तर मग आपण कोणाकडून शिकवण घ्याल, समजदार कसे व्हाल? आपणाला तर त्यांच्या अनुकूल बनावयाचे आहे, त्यांना बदलावयाचे नाही.

आजकालचे लोक फार विचित्र आहेत. जी गोष्ट आपल्याला समजली नाही ती बरोबर नाही असे म्हणतील. थोडीशी कृपा करा. कमीत कमी ती गोष्ट समजून घेण्याचा तर प्रयत्न करा. परंतु बुद्धीचे अजीर्ण झालेले असते. आपल्या बुद्धीविषयी समज झालेली असते की, यापेक्षा अधिक काही समजून घ्यावयाचे राहिलेच नाही. एकदा एक गृहथ माझ्याशी बोलू लागले, त्यावेळी मी म्हटले की, अहो महाशय, आपण दोघेही पंडित आहोत. तुझ्या मनाने तू पंडित आहेस आणि माझ्या मनाने मी पंडीत आहे. तुझे म्हणणे मी ऐकणार नाही आणि माझे म्हणणे तू ऐकणार नाहीस. मला तुझ्यापासून काही शिकावयाचे नाही आणि तुला माझ्यापासूनही काही शिकावयाचे नाही. दोन दगड एकमेकाशी टकरले तर त्यातून ठिणगी उडेल. दोन पंडित एकमेकाशी भांडले तर यातून शांती कशी काय मिळू शकेल? एखाद्याने शिष्य झाले पाहिजे, थोडे तरी नम्र झाले पाहिजे, घागर थोडी तरी रिकामी असली

पाहिजे. भरलेल्या घागरीत आणखी कसे भरता येईल. काही भाग रिकामा असेल तरच काही ना काही गोष्ट प्राप्त होऊ शकेल.

"ताड़ना" शब्दाचा अर्थ आहे-शिकवण. समुद्राने म्हटले आहे-"**प्रभु भल कीन्ह मोहि सिख दीन्ही**" "**मोहि ताड़ना दीन्ही**" असे म्हटले नाही. "ताड़ना" चा अर्थ मारणे कसा होईल? जो प्रसंग चालू आहे त्यानुसारच अर्थ होईल. विषय शिकवणीचा आहे, मारण्याचा नाहीच. ढोल, अडानी इत्यादी योग्य नसतील तर त्यांना शिकवणाऱ्यांचा दोष आहे, त्यांचा स्वतःचा दोष नाही.

**श्रोता**—ही तर त्यांची प्रशंसा झाली.

**स्वामीजी**—होय, प्रशंसा झाली. त्यांच्याठिकाणी एखादा दोष असेल तर तो त्यांचा नाही, शिकवणाऱ्यांचा आहे. अशी गोष्ट आहे. परंतु गोस्वामीजींनी नारी-जातीची निंदा केली असा त्यांच्यावर आरोप करतात. अन्नदाते हो! कृपा करा, थोडेसे समजून घ्या की, कोणत्या प्रसंगात कोणती गोष्ट आली आहे, कोणी म्हटली आहे? सांगणारा आपली स्वतःची नम्रता प्रगट करू शकतो, तो दोषारोपण करून दुसऱ्याला निकृष्ट कसा म्हणू शकतो? समुद्र नम्रतापूर्वक म्हणतो की, आपण फार चांगले केले आणि मला धडा दिला. मी तर शिकवणीचा अधिकारी आहे. योग्य रीतीने शिकवण देण्यालाच "ताड़ना" म्हणतात. म्हणून म्हटले आहे—

**लालनाद् बहवो दोषास्ताडनाद् बहवो गुणाः।**
**तस्मात् पुत्रं च शिष्यं च ताडयेत् न तु लालयेत्॥**

आईजवळ राहत असलेले बालक तितके सुधरू शकत नाही, जितके पित्याजवळ राहून सुधरते. पित्याजवळ राहून तितके सुधरू शकत नाही, जितके अध्यापकाजवळ राहून सुधरते. अध्यापकाजवळ

राहून तितके सुधरत नाही, जितके संत-महात्म्याजवळ राहून सुधरते. तात्पर्य हे आहे की, बालकावर जितका अधिक मोह राहील, त्याचे तितकेच अधिक पतन होईल. आईजवळ राहिलेले बालक प्राय: सुधरू शकत नाही. कारण आईचा बालाकावर फार मोह असतो, दया असते. जी दया बालकाला मूर्ख बनविते जी बालकाचे अहित करते, तिला दया कसे म्हणता येईल? दया तर तीच आहे, ज्यामुळे बालक जाणकार विद्वान, श्रेष्ठ बनेल. पित्याला मोह कमी असतो आणि पित्यापेक्षा अध्यापकाला मोह कमी असतो. संत-महात्मा निर्मोह असतात त्यामुळे त्यांच्याजवळ राहिल्याने बालक विलक्षण बनतो. गोस्वामीजी महाराज बालपणी संत नरहरिजी महाराज यांच्याजवळ राहत होते. ते सांगतात की, मी बालपणी सूकरक्षेत्रात गुरुंकडून रामचरित्र ऐकले, परंतु त्यावेळी मी बालक होतो, मला समज नव्हती म्हणून मी ती कथा समजू शकलो नाही.* परंतु असे झाले तरीही ते केवढे उच्च दर्जाचे संत झाले आणि त्यांनी रामचरितमानसला कितीतरी समजून घेतले आहे.



---

* मैं पुनि निज गुर सन सुनी कथा सो सूकरखेत।
समुझी नहिं तसि बालपन तब अति रहेउँ अचेत॥
(मानस १।३० क)

# ४. मातृशक्तीचा तिरस्कार

वर्तमानकाळत स्त्री-जातीचा महान तिरस्कार, घोर अपमान केला जात आहे. स्त्रीच्या महान मातृरूपाला नष्ट करून तिला केवळ भोग्यास्त्रीचे रूप दिले जात आहे. भोग्यास्त्री तर वेश्या असते. जेवढा आदर मातेचा (मातृशक्तीचा) आहे तेवढा आदर (भोग्य) स्त्रीचा नसतो. परंतु जे स्त्रीला भोग्या मानतात, स्त्रीचे गुलाम असतात; ते भोगी पुरुष ही गोष्ट काय समजू शकतील? समजूच शकत नाहीत. विवाह माता बनविण्यासाठी केला जातो. भोग्या बनविण्यासाठी नव्हे. संतान उत्पन्न करण्यासाठीच पिता मुलीचे कन्यादान करतो आणि संतान उत्पन्न करण्यासाठीच (वंश वृद्धीसाठीच) वरपक्ष कन्यादान स्विकारतो. परंतु आज स्त्रीला माता बनण्यापासून थांबवले जात आहे आणि तिला केवळ भोग्या बनविले जात आहे. हा स्त्रीजातीचा केवढा महान तिरस्कार आहे.

स्त्री वास्तविक मातृशक्ती आहे. ती स्त्री आणि पुरुष दोघांची जननी आहे. ती पत्नी तर केवळ पुरुषाचीच होते, परंतु माता पुरुषाचीही आणि स्त्रीचीही होते. पुरुष जर चांगला असला तर त्याचा केवळ स्वतःच्या कुळातच महिमा होतो परंतु स्त्री जर चांगली असली तर तिचा सासर आणि माहेर—दोन्ही कुळात महिमा होतो. राजा जनकजी सीताजीला म्हणतात—***''पुत्रि पबित्र किए कुल दोऊ''*** (मानस, अयोध्या० २८७।१)

आजकाल विवाहापूर्वी कन्येच्या स्वभाव, सहिष्णुता, आस्तिकता, धार्मिकता, कार्य-कुशलता इत्यादी गुणांना न पाहता शारीरिक सौदंर्यालाच पाहिले जात आहे. कन्येची परीक्षा परिणामाच्या

दृष्टिकोनातून न करता तात्कालिक भोगाच्या दृष्टीने केली जाते. असा विचार करत नाहीत की, चांगला स्वभाव तर सदा बरोबर राहील परंतु सुंदरता किती दिवस टिकेल?* भोगी व्यक्तीला संसारातील सर्व स्त्रीया जरी मिळाल्या तरीही तो संतुष्ट होऊ शकत नाही—

**यत् पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः।**
**न दुह्यन्ति मनःप्रीतिं पुंसः कामहतस्य ते॥**

(श्रीमद्भा० ९।१९।१३)

"पृथीवर जेवढे धान्य, सुवर्ण, पशू आणि स्त्रीया आहेत त्या सर्वच्या सर्व मिळूनही त्या पुरुषाच्या मनाला संतुष्ट करू शकत नाहीत, जो कामनांच्या आघाताने जर्जर होत आहे."

अशा भोगी व्यक्तीच नसबंदी, गर्भपात इत्यादी महापाप करतात. विवाह वंशवृद्धीसाठी केला जातो. जर कन्या सद्गुणी-सदाचारी असेल तर विवाहाच्यानंतर तिची संतान-सुद्धा सद्गुणी-सदाचारी होईल, कारण सहसा मातेचाच स्वभाव संतानात उतरतो. एक मारवाडी म्हण आहे—***"नर नानाणे जाये है'*** अर्थात मनुष्याचा स्वभाव आजोळाकडे जातो. ***"माँ पर पूत, पिता पर घोड़ा। बहुत नहीं तो थोड़ा थोड़ा।"***

कन्येला दान देण्यातही तिचा आदर आहे, तिरस्कार नाही.

---

* द्रौपदी अत्यंत सुंदर असल्यामुळेच जयद्रथ, कीचक आणि अठरा अक्षौहिणी सेना मारली गेली. म्हणून म्हटले गेले आहे—

ऋणकर्ता पिता शत्रुः माता च व्यभिचारिणी।
भार्या रूपवती शत्रुः पुत्रः शत्रुरपण्डितः॥

(चाणक्यनीति ६।१०)

"कर्जदार पिता, व्यभिचारिणी माता, सुंदर पत्नी आणि मूर्ख पुत्र—हे चारी शत्रूसारखे (दुःख देणारे) आहेत."

हे दान दुसऱ्या दानासारखे नव्हे. दुसऱ्या दानात तर दान दिलेल्या वस्तूवर दात्याचा अधिकार राहत नाही, परंतु कन्येला संतान झाल्यावर माता-पित्याचा तिच्यावर अधिकार होतो आणि आवश्कता भासल्यास ते तिच्या घरचे अन्न-पाणी घेऊ शकतात. कारण कन्येच्या पतीने केवळ पितृऋणातून मुक्त होण्यासाठीच कन्या स्विकार केलेली असते आणि तिच्यापासून संतान उत्पन्न झाल्यावर तो पितृ ऋणातून मुक्त होतो. म्हणूनच भिन्न गोत्र असले तरीही नातू आपल्या (मातेच्या आई-वडिलांचे) आजी-आजोबांचे श्राद्ध-तर्पण करतो, जे शास्त्रात आणि लोकात प्रसिद्ध आहे.

आमच्या शास्त्रांमध्ये स्त्रीजातीला फारच आदर दिला गेला आहे. स्त्रीचे रक्षण करण्याच्या उद्देशाने शास्त्राने तिला पिता, पती अथवा पुत्र यांच्या आश्रित राहण्याची आज्ञा दिली आहे, ज्यामुळे तिला जागोजागी वाईट परिस्थितीला तोंड देण्याची वेळ येऊ नये. ती वेश्या बनू नये.* स्त्रीने नोकरी करणे तर हा तिचा तिरस्कार आहे. तिचा महिमा तर घरी राहण्यातच आहे. घरी ती महाराणी असते परंतु घराच्या बाहेर पडली तर ती नोकरानी होते. घरी तर ती एका पुरुषाच्या अधीन राहील, परंतु बाहेर तिला अनेक स्त्री-पुरुषांच्या अधीन रहावे लागेल. आपल्यापेक्षा उच्च असलेल्या पदाधिकाऱ्यांची अधीनता, फटकार, तिरस्कार

---

* भ्रमन्संपूज्यते राजा भ्रमन्संपूज्यते द्विजः।
भ्रमन्संपूज्यते योगी भ्रमन्ती स्त्री विनश्यति॥

(चाणक्यनीति० ६।४)

''भ्रमण करण्याने राजा पूज्य होतो, भ्रमण करण्याने ब्राह्मण पूज्य होतो, भ्रमण करण्याने योगी पूज्य होतो, परंतु स्त्रीने भ्रमण केल्याने तर ती नष्ट होते अर्थात तिचे पतन होते.''

सहन करावा लागेल, जो तिच्या कोमल हृदयाच्या, स्वभावाच्या विरुद्ध असतो. ती आदराला योग्य आहे, तिरस्काराच्या योग्य नाही. पिता, पती अथवा पुत्र यांची अधीनता वास्तविक स्त्रीला पराधीन करण्यासाठी नाही, उलट महान स्वाधीन बनविण्यासाठी आहे. घरात वृद्ध ''मातेचा'' सर्वात अधिक आदर होतो. मुले-नातू इत्यादी सर्व तिचा आदर करतात, परंतु घराच्या बाहेर म्हाताऱ्या ''स्त्री'' चा सर्व ठिकाणी तिरस्कार होतो.

स्त्री बाहेरचे काम व्यवथित करू शकत नाही आणि पुरुष घरचे काम व्यवस्थित करू शकत नाही. स्त्री नोकरी करते तर तिथेही ती स्वेटर विणत बसते, घरचे काम करते. पुरुष बढाया मारतात की, स्त्रीया घरी काय काम करतात, काम तर आम्हीच करतो, पैसा तर आम्हीच मिळवितो. जर पुरुष एखाद्या दिवशी घरी राहून स्वयंपाकाचे काम केले आणि लहान मुलाला सांभाळले तर त्याला कळून येईल की, स्त्रीया काय काम करतात! जर पत्नी मरण पावली तर लहान मुलाला सासू, आजी अथवा आत्या-बहिणीकडे पाठवून देतात, कारण पुरुष त्यांचा सांभाळ, पालन-पोषण करू शकत नाही. परंतु पती मरण पावला तर पत्नी कष्ट सहन करूनसुद्धा मुलांचे पालन-पोषण करते, त्यांना शालेय शिक्षण देऊन योग्य बनविते. कारण स्त्री मातृशक्ती आहे, तिच्यात पालन करण्याची योग्यता आहे. मी लहान मुला-मुलींचे वागणे पाहिले आहे. मुलीला जर खाऊ मिळाला तर ती त्याला खिशात ठेवते की, आपल्या लहान भावा-बहिणींना तो द्यावा. परंतु मुलाला जर खाऊ मिळाला तर तो खाऊन टाकतो. एखादा साधू, दरिद्री, भुकेला माणूस बसला असेल तर कित्येक पुरुष त्याच्या जवळून निघून जातील, त्यांच्या मनात त्याला खाऊ

घालण्याचा भाव येणारच नाही. परंतु स्त्रीया विचारतील की बाबाजी! काही खाता का? कारण स्त्रीयांध्ये दया असते. त्यांना बालकांचे पालन-पोषण करायचे असते म्हणून भगवंतांनी त्यांना असे हृदय प्रदान केले आहे.

आजकाल स्त्रीयांना पुरुषासमान अधिकार देण्याची गोष्ट बोलली जाते. परंतु शास्त्रांनी मातेच्या रुपात स्त्रीला पुरुषापेक्षा ही विशेष अधिकार दिला आहे—

**सहस्त्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते ॥**

(मनु० २।१४५)

"मातेचा दर्जा पित्यापेक्षा हजार पटीने अधिक मानला गेला आहे."

**सर्ववन्द्येन यतिना प्रसूर्वन्द्या प्रयत्नतः ॥**

(स्कंदपुराण काशी० ११।५०)

"सर्वांद्वारा वंदनीय संन्याशालासुद्धा मातेची प्रयत्नपूर्वक वंदना केली पाहिजे."

आजकाल गर्भ-परीक्षण केले जाते आणि गर्भात कन्या असेल तर गर्भ काढून टाकला जातो, हा काय स्त्रीला समान अधिकार दिला जात आहे?

"आई" शब्द उच्चारल्याने जो भाव प्रगट होतो, तसा भाव "स्त्री" म्हटल्याने प्रगट होत नाही. म्हणून श्रीशंकराचार्यजी महाराज भगवान श्रीकृष्णालासुद्धा "आई" म्हणून पुकारतात— "**मातः कृष्णाभिधाने**" (प्रबोध० २४४) उपनिषदात **मातृदेवो भव, पितृदेवो भव** म्हणून सर्वात प्रथम आईची सेवा करण्याची आज्ञा दिली गेली आहे. '**वन्दे मातरम्**' यातही मातेचीच वंदना केली गेली आहे. हिंदूधर्मात मातृशक्तीच्या उपासनेचे विशेष

महत्त्व आहे. ईश्वर कोटीच्या पाच देवतांमध्येसुद्धा मातृशक्तीचे (भगवतीचे) स्थान आहे. देवीभागवत, दुर्गासप्तशती इत्यादी अनेक ग्रंथ मातृशक्तीवरच रचले गेले आहेत. जगताच्या संपूर्ण स्त्रीयांना मातृशक्तीचेच रूप मानले गेले आहे—

**विद्याः समस्तास्तव देवि भेदाः**
**स्त्रियः समस्ताः सकला जगत्सु।**

(दुर्गासप्तशती ११।६)

परंतु भोगीलोक मातृशक्तीला कसे समजणार? समजूच शकत नाहीत. ते तर तिला भोग्याच समजतात.

शास्त्रांमध्ये स्त्रीयांचा पुनर्विवाह न करता वैधव्य धर्माचे पालन करण्यासाठी सांगितले आहे तर हा त्यांचा आदर आहे, तिरस्कार नव्हे. धर्मपालन करण्यासाठी कष्ट सहन करणे हा तिरस्कार नव्हे, उलट तितिक्षा, तपश्चर्या आहे. तितिक्षू, तपस्वी व्यक्तीचा समाजात फार मोठा आदर होतो. पुरुषाने स्त्रीचा तिरस्कार करावा, तिला दुःख द्यावे, तिला घटस्फोट द्यावा, तिला मारावे—असे शास्त्रांत कुठेही म्हटले गेले नाही. एवढेच नव्हे तर स्त्रीकडून कितीही मोठा अपराध झाला तरीही तिला मार-पीट करण्याचे विधान नाही उलट ते सर्व क्षम्य आहे.

भीष्माचार्य कौरवसेनेचे रक्षक होते—"**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्**" (गीता १।१०) परंतु दुर्योधन त्यांचेही रक्षण करण्यासाठी आपल्या सेनेला आदेश देतो—"**भीष्ममेवाभि-रक्षन्तु भवन्तः सर्व एव हि**" (गीता १।११) कारण दुर्योधनाला हे माहित होते की, शिखंडी जेव्हा समोर येईल तेव्हा जरी भीष्माचार्यांचे प्राण संकटात आले तरी ते त्याच्यावर कधीही शस्त्र चालवणार नाहीत, शिखंडी पूर्वी स्त्री होता, वर्तमानात

नव्हे. परंतु वर्तमानात पुरुषरूपात असला तरीही भीष्माचार्य त्याला स्त्रीच मानतात आणि त्याच्यावर शस्त्र चालवित नाहीत उलट मृत्यू स्वीकार करतात—हा स्त्रीजातीचा केवढा सन्मान आहे.

थोड्या वर्षापूर्वीची गोष्ट आहे. एकदा जोधपूरचे राजे सर उम्मेदसिंहजी आणि बिकानेरचे राजे सर शार्दूल सिंहजी शिकारीसाठी जंगलात गेले. तेथे शार्दूलसिंहजीची गोळी पायाला लागल्याने एक सिंहिण घायळ झाली. घायळ होऊन ती गुरगुर करीत त्यांच्याकडे आली त्यावेळी उम्मेदसिंहजी म्हणाले—"हिरा! हे काय केले? ही तर मादी आहे" हे कळल्यानंतर त्यांनी पुन्हा तिच्यावर गोळी चालविली नाही आणि फक्त प्रयत्न करून तिच्यापासून स्वतःचा बचाव केला हा स्त्रीजातीचा केवढा सन्मान आहे.

शास्त्रांनी पुरुषांसाठी तर संध्योपासना, अग्निहोत्र, यज्ञ, वेदपाठ इत्यादी कितीतरी कर्तव्यकर्म सांगितले आहेत, परंतु स्त्रीयांना त्या सर्व कर्तव्यकर्मापासून, पितृऋण इत्यादी ऋणांपासून मुक्त ठेवले आहे* आणि तिला पतीच्या अर्ध्या पुण्याचे भागीदार बनविले आहे. परंतु शास्त्र न जाणणारे हा विषय कसे समजतील? आज स्त्रीयांना त्यांच्या कर्तव्यापासून विमुख करून अनेक झंझटीत फसविले जात आहे. शास्त्रांनी केवळ पुरुषालाच यज्ञोपवीत धारण

---

* वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकःस्मृतः।
पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया॥
(मनु० २।६७)

स्त्रीयांसाठी वैवाहिक विधीचे पालनच वैदिक संस्कार (यज्ञोपवीत), पतीची सेवा हाच गुरुकुल वास (वेदाध्ययन) आणि गृहकार्य हेच अग्निहोत्र म्हटले गेले आहे.

एकइ धर्म एक ब्रत नेमा।
कायँ बचन मन पति पद प्रेमा॥ (मानस अरण्य० ५।५)

करून संध्योपासना इत्यादी विशेष कर्म करण्याची आज्ञा दिली आहे. परंतु आज स्त्रीला यज्ञोपवीत देऊन तिला उलट संकटात टाकले जात आहे. ही काय बुद्धिमानीची गोष्ट आहे? पत्नी पतीद्वारा केल्या गेलेल्या पुण्य कर्मांची भागीदार तर होते परंतु पापकर्मांची भागीदार होत नाही. तिला फुकटात अर्धे पुण्य मिळते. समाजात देखील असे दिसते की, डॉक्टर किंवा वकिल वगैरेंची अशिक्षित पत्नी जरी असली तरी तिला डॉक्टरीण बाई, वकिलीण बाई असे म्हणतात. वास्तविक आज अभिमानाला महत्त्व दिले जात आहे, म्हणून नम्रता वाढण्याच्या गोष्टी न सांगता अभिमान वृद्धिंगत करण्यासंबंधीच गोष्ट सांगितली आणि शिकवली जात आहे, जी पतनाला कारण आहे. "पुरुष असे करत आहेत तर आम्ही का करू नये? आम्ही का मागे रहावे?"—ही केवळ अभिमान वाढविण्याची गोष्ट आहे. अभिमान जन्म-मरणाचे मूळ अणि अनेक प्रकारचे क्लेश तसेच समस्त शोक देणारे आहे—

**संसृत मूल सूलप्रद नाना।**
**सकल सोक दायक अभिमाना॥**

(मानस० उत्तर० ७४।३)

अभिमानी व्यक्ती शास्त्रांची भाषा काय समजेल? समजूच शकत नाही. संसाराच्या हितासाठी मातृशक्तीने पुष्कळ काम केले आहे. रक्तबीज इत्यादी राक्षसांचा संहारही मातृशक्तीनेच केला आहे. मातृशक्तीनेच आमच्या हिंदू संस्कृतीचे रक्षण केले आहे. आजही प्रत्यक्ष पाहण्यात येते की, आमचे व्रत-नियम, रीती-रिवाज, माता-पित्याचे श्राद्ध इत्यादीची माहिती जेवढी स्त्रीयांना असते, तेवढी पुरुषांना नसते. पुरुष आपले कुलाचारही

विसरून जातो परंतु स्त्रीयां दुसऱ्या कुलाच्या असूनही त्या स्मरण करून देतात की, अमुक दिवशी तुमच्या माता अथवा पित्याचे श्राद्ध आहे इत्यादी. मंदिरात कथा कीर्तनात, सत्संगात जेवढ्या स्त्रीया जातात, तेवढे पुरुष जात नाहीत. कार्तिक स्नान, व्रत, दान, पूजन रामायण इत्यादीचा पाठ जेवढ्या स्त्रीया करतात तेवढे पुरुष करत नाहीत. जर त्यांचे चरित्र नष्ट झाले तर संस्कृतीचे रक्षण कसे होईल? एक श्लोक येतो—

**असंतुष्टा द्विजा नष्टाः संतुष्टाश्च महीभुजः।**
**सलज्जा गणिका नष्टा निर्लज्जाश्च कुलांगनाः॥**

(चाणक्य नीती० ८।१८)

'संतोषहीन ब्राह्मण नष्ट होतो, संतोषी राजा नष्ट होतो, लज्जावती वेश्या नष्ट होते आणि लज्जाहीन कुलवधू नष्ट होते अर्थात तिचे पतन होते.'

वर्तमानकाळात संतति-निरोधाच्या कृत्रिम उपायांच्या प्रचार-प्रसारामुळे स्त्रीयांमध्ये लज्जा, शील, सतीत्व, सच्चारित्र्य, सदाचरण इत्यादीचा नाश होत आहे. परिणाम स्वरूप स्त्रीजात केवळ भोग्य वस्तू बनत चालली आहे. जर स्त्रीजातीचे चारित्र्य भ्रष्ट झाले तर देशाची काय दशा होईल? पुढे येणारी पीढी आपल्या प्रथम गुरू असलेल्या मातेपासून काय शिकवण घेईल? स्त्री जर बिघडली तर तिच्यापासून पैदा होणारी मुले-मुली (स्त्री-पुरुष) दोन्ही बिघडतील.जर स्त्री व्यवस्थित राहिली तर पुरुष बिघडला तरी संतान बिघडणार नाही. म्हणून स्त्रीयांचे चरित्र, शील, लज्जा इत्यादीचे रक्षण करणे तिला अपमानित, तिरस्कृत होऊ न देणे मानवजातीचे कर्तव्य आहे.

